लातूर महानगरपालिकेकडे हस्तांतरीत केलेले एकूण नऊ रस्ते अवर्गीकृत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- रवियो-२०१७/प्र.क्र.२७/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :-३१ मार्च, २०१७.

पहावे :-

१) शासन निर्णय क्रमांक- टीआरएस २०१५/प्र.क्र.६६/रस्ते-१ दिनांक- २३/०४/२०१५.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र./ मुअऔ/का-१४/ प्रआ/रस्तेहस्तांतरण दिनांक १३/०२/२०१७.

**प्रस्तावना :-**

लातूर महानगरपालिकेकडे देखभाल व दुरूस्तीसाठी हस्तांतरीत केलेले एकूण नऊ रस्ते अवर्गीकृत करणेबाबतचा प्रस्ताव मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांनी सादर केलेला आहे. सदर प्रस्तावातील रस्ते, शासन निर्णय क्रमांक- टीआरएस २०१५/प्र.क्र.६६/रस्ते-१, दिनांक- २३/०४/२०१५ अन्वये सार्वजनिक बांधकाम विभागाकडून लातूर महानगरपालिकेकडे सुधारणा, दुरूस्ती व देखभालीसाठी हस्तांतरीत करण्यात आलेले आहेत. त्यानुषंगाने लातूर महानगरपालिकेकडे हस्तांतरीत केलेले एकूण नऊ रस्ते अवर्गीकृत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद यांचा प्रस्ताव तसेच संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक- आरबीडी-१०८१/८७१/रस्ते-७, दि. ०९/०३/२००१ मधील टिप ५ मधील तरतूद विचारात घेऊन, लातूर जिल्ह्यातील लातूर महानगरपालिका हद्दीतील खालील नमूद केलेले रस्ते अवर्गीकृत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | रवियो २००१-२१ नुसार रस्त्याचे नाव | अवर्गीकृत करावयाच्या रस्त्याची लांबी व साखळी क्रमांक | एकूण लांबी |
|---|---|---|---|
| १. | रत्नागिरी-सोलापूर-लातूर-नांदेड-नागपूर रस्ता प्ररामा क्र.६ | राजीव गांधी चौक ते नविन नांदेड नाका कि.मी. ४८७/०० ते ४९३/३०० | ६.३०० कि.मी. |
| | | नविन नांदेड नाका ते शेतकी शाळा रस्ता कि.मी. ४९३/३०० ते ४९३/८०० | ०.५०० कि.मी. |
| २. | लातूर- औसा ते लातूर- बार्शी वळण रस्ता रामा-२४३ | औसा रोड ते बार्शी रोड ०/०० ते ४/२४० | ४.२४० कि.मी. |
| ३. | लातूर- बार्शी - लातूर अंबेजोगाई वळण रस्ता रामा-२४३ | बार्शी रोड ते अंबेजोगाई रस्ता ०/०० ते ३/६०० | ३.६०० कि.मी. |
| ४. | लातूर- अंबेजोगाई ते लातूर-नांदेड वळण रस्ता रामा-२४३ | अंबेजोगाई रस्ता ते नांदेड रस्ता ०/०० ते ३/९०० | ३.९०० कि.मी. |

| | | | |
|---|---|---|---|
| ५. | म्हसवड- माळशिरस- टेंभुर्णी कुर्डुवाडी बार्शी -लातूर रस्ता (जुनी रेल्वे लाईन) रामा-१४५ | शासकीय महिला निवासी तंत्रनिकेतन ते नविन नांदेड नाका रस्ता २२१/६०० ते २३२/२०० | १०.६०० कि.मी |
| | | विवेकानंद चौक ते लातूर शहर डी.पी. प्लॅन हद्द रस्ता ०/०० ते १/५०० | १.५०० कि.मी. |
| ६. | म्हसवड- माळशिरस- टेंभुर्णी कुर्डुवाडी बार्शी -लातूर रस्ता (जुनी रेल्वे लाईन) रामा-२४२ | राजस्थान शाळा ते शिवाजी चौक रस्ता ०/०० ते १/२५० | १.२५० कि.मी. |
| | | शिवाजी चौक ते शासकीय महिला निवासी तंत्रनिकेतन (लातूर शहर डी.पी. प्लॅन हद्द) रस्ता १/२५० ते ५/४०० | ४.१५० कि.मी. |
| ७. | तिसगांव-पाथर्डी-पाडळसिंगी-लोखं डी-सावरगाव-लातूर रस्ता रामा-२३२ | रेणापूर नाका ते शिवाजी चौक रस्ता २०३/४२५ ते २०५/४०० | १.९७५ कि.मी. |
| ८. | लातूर-निटूर-लांबोटा-तोगरी रस्ता रामा-२३६ | शिवाजी चौक ते राजीव गांधी चौक रस्ता २०५/४०० ते २०८/४९० | ३.०९० कि.मी. |
| | | विवेकानंद चौक ते म्हाडा कॉलनी चौक ०/०० ते १/५०० | १.५०० कि.मी. |
| ९. | लातूर-कव्वा-जमालपूर-खुंटेगांव-हासेवाडी-जयनगर ते अपचुंदा ते लामजनापाटी रस्ता प्रजिमा-५० | गुळ मार्केट ते कव्हा तलाव रस्ता ०/०० ते १/५०० | १.५०० कि.मी. |
| | एकूण | | ४४.१०५ कि.मी |

अशी एकूण **४४.१०५ कि.मी.** लांबी अवर्गीकृत करण्यात येत आहे. तसेच सदर रस्त्यांच्या देखभाल-दुरुस्तीचा खर्च लातूर महानगरपालिकेकडून करण्यात येईल व अवर्गीकृत केलेल्या रस्त्यांवर होणाऱ्या देखभाल-दुरूस्ती करिता शासनामार्फत कोणतेही अतिरिक्त अनुदान देण्यात येणार नाही . या अटीच्या अधीन राहून सदर लातूर महानगरपालिकेकडे हस्तांतरीत केलेल्या रस्त्यांना अवर्गीकृत करण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०११८४८१५८५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2017.04.01 19:20:42 +05'30'

**( प्रशांत पाटील )**

अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

२. विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
३. अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, उस्मानाबाद (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
४. जिल्हाधिकारी, लातूर.
५. आयुक्त,महानगरपालिका लातूर.
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, लातूर.
७. कार्यकारी अभियंता, (सा.बां.) जिल्हा परिषद, लातूर.
८. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
९. रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०.निवडनस्ती.